दूता हातें तयातें कळवुनी अपुली मोंगलाच्या प्रदेशीं,
होती जी देशमूखी परत नृपति घे मागुती शौर्यराशी ॥४४॥
होता आदिलखाननामक मुसल्मान स्वयें, कोंकणीं,
लोकांतें करि तो परोपरि बहू बाधा असें जाणुनी ॥
त्यातें ही विपुलें बलें करुनियां जिंकीत युद्धांगणीं,
जो पंचाननसा स्वयें हि हरिणा ऐसें अरीतें गणीं ॥४५॥
कृत्यें यापरि दुःसहें शिवजिनें राज्यांत आरंभिलीं,
तीं तीं शूर अणी बलाढ्य ह्मणुनी त्या मोंगलें साहिलीं ॥
होता यौवनकीर्तिचंद्र सगळा खंडीं यया भारतीं,
तद्ग्रासार्थच्चि वाटतें उगवला केतूचें हा भूपती ॥४६॥

### आर्या.

नंतर नवीन सेना, ठेउनियां तो समुद्रतटदुर्गं ॥
घेताजाला धाडुनि, अपुले तेथेंहि शूर बळवर्ग ॥ ४७ ॥ — तो समुद्रतीरचे किल्ले घेतो.
नौकासैनिक ठेउनि, जिंकितसे अब्धितें हि भूमिपती ॥
आपेंही त्या केलें, जाणो भूमिस्सरें स्वकीय पती ॥ ४८ ॥ — तो अरमार ठेवितो.
अल्लीचा दिल्लीशा, सह सल्ला होय तें तैयें जें का ॥
केले पठाण दूर, स्वतां शिवें ठेविलें तयां लोकां ॥४९॥ — तो अल्लीनें दूर केलेले पठाणलोक चाकरीस ठेवितो त्यावरउत्प्रेक्षा.

---

१ शिवाजी. २ कोंकणांत. ३–४ आपण सिंहाप्रमाणें (असून.) ५–६ शत्रु तें हरिणाप्रमाणें. ७ योजी. ८ शिवाजी. ९ यवनाचा कीर्तिरूप चंद्र. १० हिंदुस्थानांत. ११ कीर्तिचंद्रग्रासार्थ. १२ केतुनामक ग्रह. १३ समुद्रतीरचे किल्ले. १४ समुद्रातें. १५ जलसमुदायानें. १६ पृथ्वीच्या हेव्यानें पृथ्वीचा पति होता ह्मणून पाण्यानेंही आपला पति शिवाजी केला असी उत्प्रेक्षा. (येथें क्षिति आणि आपएतत्शब्दगत स्त्रीलिंग पती करण्यास अनुकूळ आहे.) १७ अल्लीनें.

जाला आ[1]पक्षितिपति, ह्मणुनच जाणों पठाण अलीचि ॥
केवळें भू[2-3]पति सोडुनि, सेवक झाले शिवांघ्रिवल्लीचे[4] ॥५०॥
चंद्रघ्नरघुवी[5-6]र तो, केला सैनिक पठाणलोकांचा ॥
तेजोभंजक रिपुचा, नच शोभति होहिऱ्या पुढें कांचा ॥५१॥

श्लोक.

ऐसा त्याचा प्र[7]तापज्वलन अनुदिनीं वाढता होय जेव्हां,
नेटाजी मु[8-9]ख्य सेनाधिप पवनचि ते जाहले साह्य तेव्हां ॥
वैरिव्रा[10]ताटवीचें दहन करित तैं धूम जो कां निघाला,
त्यायोगें अलि[11]कीर्त्योषधिप, जणुं[12] तैये[13] कालिमाप्राप्त जाला ॥५२

अली हा अफसुलखानाला शिवाजीवर योजितो.

ऐसा तो रिपु पाहुनी प्रबळ हो, अलीनृपें सत्वरी,
कोपानें बहु सैन्य सिद्ध करुनी, त्या योजिलें त्यावरी ॥
होता आफ़ुसुलखान नामक मुसल्मान प्रतापी महा,
सेनानायक त्याजला करुनियां धाडीतसे तो पहा ॥५३॥
घोडेस्वार तसेंच पायदळ जें योधांस ही मारितें,
तोफा आणिक खड्ग तोमर, गदा, भाते, न बाणीं रिते[14]
जे जाला मदमत्तवारण, तसीं उंटें अकुंठें हि तीं,
सेना आफुसुलखान घेउनि निघे, हाले भरें तैं क्षिती ५४
जातां गर्जुनि तो[15] वदे निजजनांमाजी बहू दांडगा,
जैसा कां विपिनीं[16] कुरंगनिकरीं[17] बैसोनियां लांडगा ॥

१ आप आणि क्षिति या दोहींचाही पति शिवाजी ह्मणून. २-३ एक्या क्षितीचाच पति (अली) ४ शिवाजीचे चरणवल्लीचे. ५-६ चंद्रराव मोऱ्याला मारणारा रघुनाथपंत. ७ प्रतापरूप अग्नि. ८-९ नेटाजी पालकर प्रमुख सरदार हेंच वायु. १० शत्रुसमुदायरूप अरण्याचें. ११ अलीचा कीर्तिरूप चंद्र. १२ अलीच्या कीर्तिरूप चंद्राला. १३ काळेपणा. १४ शून्य (हें भात्याचें विशेषण.) १५ आफ़ुसुलखान. १६ अरण्यांत. १७ हरिणाच्या समुदायांत.

आतां जाउनि येथुनी शिवजिला सिंह स्वयें जंबुका,
तैसा मी वधुनी तया धरुनि वा घेवोनि येतों निका॥५५॥
तार्क्ष्यापुढें साप कसा टिकेल, हिऱ्यापुढें गार कसी विकेल॥
माझ्यापुढें तेवि शिवाजि काय, त्याच्या क्षणार्द्धांत चिरीन काय ५६
ऐसी ऐकुनि वल्गना नृपतिनें, त्या यावनें सत्कृती,
खानाची बहुतांपरी करुनियां, आरंभिली तत्स्तुती ॥
तूं वा धन्य नसेचि अन्य तुजसा, काढोनियां स्वीकरीं,
कांटों तो शिवरूप मत्हृदयिचा निःशल्य मातें करी ५७
बोलोनियां यापरि गर्वयोगें, तो खान सेनेसह जाय वेगें ॥
तेव्हां प्रतापाख्यगडा समीप, जेथें असे तो शिवराय भूप ५८

**आर्या.**

अल्पहि असतां देशी, बहुविध अस्मज्जनांस तापातें ॥
"तरि लववी शिर अथवा, अविलंबित तूं स्वकीय चापातें" ५९
क्षुद्रास मारणें हें, अनुचित जाणोनि सिंह कुतऱ्यास ॥
तैसा मी अज तुजला, देतों घे जीवदान भितऱ्यास॥ ६०॥
संदेश असा उद्धत, बलमत्तें धाडिला तयें कुटिलें ॥
परिसुनि ह्मणे नरपती, कपट करूनि यास पाहिजे कुटिलें ६१
मग तो भेदविशारद, करिता जाला सुयुक्ति शत्रुवधीं ॥
अनलसपणें जयाच्या, मैलेंगे कार्यास अल्प ही अवधी ६२

शिवाजी कपट युक्तीनें अफसुलखानास मारितो तो प्रकार.

**श्लोक.**

सामोपाय करोनियां वश करी तत्सेवकां भूपती,
जीवांचा क्षय होइना जिंकडुनी, युक्ती करी त्यारिती ॥

---

१ कोल्ह्याला. २ गरुडापुढें. ३ देह. ४ सत्कार. ५ शिवाजी. हाच माझ्या हृदयातील कंटक. ६ शल्यरहित (निश्चित.) ७ देतोस. * हा विकल्प चमत्कृतिजनक आहे ह्मणून हा विकल्पालंकार होय. ८ खानानें. ९ तयें याचें विशेषण. १० शिवाजी. ११ भेदी- ... १२ आलस न करितां. १३ नलगे.

धाडी त्यास निरोप कीं अबल मी, तुह्मी प्रतापी खरे,
सेनाही तुमची विलोकुनि मला अंगीं भरे कांपरें ॥ ६३ ॥

**आर्या.**

यास्तव सेना सोडुनि, दूर ठिकाणीं बसाल येउनियां ॥
तरि मी शरण तुह्माला, येइन संपूर्ण, राज्य टाकुनियां ६४
ऐकुनि संदेशा असा, बोले उपहास करुनि तो खान ॥
येतां उंदीर शरण, पावे केसरि कदापि तोखा न ॥ ६५ ॥
आहे असें तथापी, याचितसे भेट माझि पामर हा ॥
कळवा त्या कीं नवदूं, शब्दहि शरणार्थि यांस "तूं मर" हा ६६.
उदईक भेट होइल, ऐसें मदमत्त कळवि तो राया ॥
शिववीर्यास न जाणुन, स्वबळाचा मूर्ख दावि तोरा या ६७

**श्लोक.**

अन्येद्यू भूप सारी उठुनि झडकरी स्नानपूजादिकर्मा ॥
विप्रांतें क्षिप्र संतोषित करि, करुनी स्वीकरी दानधर्मा,
मातेच्या पादपीठीं निज शिरकमला ठेउनी भक्तिभावें,
बोले "माते असोगे जयमम, रिपुचानाशतैसास्वभावें" ॥ ६८
आला दाटुनि कंठ तेंवि तनुही रोमांचिता जाहली,
नेत्रीं अश्रुजलें निघूनि विपुलें गालावरी चालली ॥
कांपे थरथर घाम फारचि तदा प्रेमातिरेकें अला,
ऐसा सात्विकभाव भूपहृदयीं उत्पन्न कीं जाहला ॥ ६९ ॥
त्या प्रेमास विलोकुनी नृपतिच्या माता वदे सत्वरी,
वत्सा होईल इष्टसिद्धि तव बा भी ना धरी अंतरीं ॥

१ निरोप. २ सिंह. ३ संतोषाप्रत. ४ गर्व. ५ दुसरे दिवशीं.
६ आपणी. ७ करिता जाळा. ८ स्वहस्तें. ९ शिवाजी.

आशीर्वाद असा करीत शिरसा तो मान्य जैं भूपती,
देहीं कांति चढे जयेस[1] बघुनी, डोळे अती दीपती॥७०॥
आंतोनी कवचा वरी अंगरखा, डोईसही मंदिला,
घाली वाघनखें करामधिं[2] धरी डाव्या बळें आगळा ॥
शस्त्रा अस्तनिमाजि गुप्त उजव्या हातांत तें घेउनी,
वेगानें सरिं चिंतुनी भगवती, राजा निघे तेथुनी॥७१॥
रूपानें सुकुमार तो नृप परी होता बळें आगळा,
तेजाचा भर जेंवि फार दिसतो अल्पाहि त्या इंगळा ॥
किंवा सिंहशिशू लघूच दिसतो देहाकृतीनें जरी,
मारी तो क्षण एकही नलगतां मतेभराजीं[3] तरी ॥ ७२ ॥
आला अफ़ुसुलखान जेथ बसला होता तयाच स्थळीं,
दे आलिंगन त्यास संभ्रमवशें घालोनि बाहू गळीं ॥
तेव्हां वाघनखें उरीं खुपसितां भूपें, ह्मणे रे दगा ॥
खड्गातें उपसोनि तो[4] झटकरी हाणी[5] नृपा दांडगा॥७३॥

### आर्या.

चुकवुनियां घायातें, खड्गा त्याच्याचि हिसकुनी स्वकरीं॥
बिचव्यानें[6] आपुल्या नृप, शत्रु तनू मस्तकांस भिन्न करी[7]७४
वज्राहत[8] पर्वतसा, कोसळला वैरिदेह भूमितळीं ॥ अफ़सुलखान मरुनें पडतो.
संकेतानें केला, तोफेचा बार एक तत्काळीं ॥ ७५ ॥

---

१ कांतीस. २ हें करामधीं याचें विशेषण. ३ मस्त हत्तींच्या राजाला. ४ अफ़सुलखान. ५ या क्रियेचा कर्ता आफ़सुलखान हा अध्याहृत आहे. ६ शस्त्रविशेष. ७ शत्रूचा देह व मस्तक यांस वेगळें करी. ८ ज्यावर वज्राचा आघात झाला असा. ९ आह्मी तोफेचा बार केला ह्मणजे तुह्मी शत्रूच्या लष्कारावर छापा घालावा अशा संकेतानें.

श्लोक.

त्याच्या लष्करावर शिवाजीचे सरदार छापा घालतात.

अपशकुनि नृपतीच्या सैनिकीं धांव केली,
लुटुन सकल त्यांणीं वैरिसंपत्ति नेली ॥
गजतुरंग हत्यारें सर्वही तोफखाना,
हिरुनि करित भूप स्वस्थळातें रवाना ॥ ७६ ॥
सभय यवनसेना शीघ्र तेव्हां पळाली,
सकल हतुनि शस्त्रें सैनिकांच्या गळालीं ॥
थरथर तनु कांपे भोंवडी त्यांस आली,
असि कठिण अवस्था वैरियां प्राप्त जाली ॥ ७७
रडत ह्मणाति कोणी "क्यांकहूं दौर अल्ला,"
करिति निजपतीतें येउनी कोणि गिल्ला ॥
समजुनि निजहानी यापरी अल्लिभूपें,
पुनरपि नवसेना सिद्ध केली सकोपें ॥ ७८ ॥

आर्या.

इकडे शिवसेनेनें, यवनाची पाठ घेतली फार ॥
नच तंव कांहीं उरला, शत्रूच्या दुर्दशा[?]धिला पार ७

श्लोक.

पन्हाळा तसे दुर्ग आणीक त्यानें,
बहू जिंकिले शत्रुचे तैं नृपानें ॥
तसी घेतली खंडणी यावनांची,
जया वासना थोर विप्रावनीची ॥ ८० ॥

आर्या.

अली हा रुस्तम जमान यास शिवाजीवर पाठविती.

सेनेवर्ती रुस्तम-जमान नामा करोनि सरदार ॥
पाठविला अल्लीनें, मारायाला शिवाजिला ठार ॥ ८१ ॥

१ ब्राह्मणसंरक्षणाची.

आला युद्ध करूं तो, शिवजीच्या सैनिकांसवें थोर ॥
परि चालेल कसाहो, सापाचा गारुड्यापुढें जोर ॥८२॥
रायें पराभवोनी, त्याचें सर्वस्वही तदा लुटिलें ॥
कुटिलें सेनेसह त्या, दूरवरी मार देवुनी पिटिलें ॥८३॥
भूपें वैरिपुराच्या[1], दारापर्यंत देश लुटिला हो ॥
तंव तो अल्ली नरपति, पुनश्च युद्धार्थ घेतसे लाहो॥८४॥

*रुस्तुम पराभव पावतो.*

सिद्धीजोहरनामा, होता विख्यात शूर जो फार ॥
त्याला धाडी अल्ली, देवुनि सेना तयासह अपार ॥८५॥
हत्ती घोडे पैसी[2], तोफा इत्यादि युद्धसामग्री ॥
घेवुनि आला ज्याच्या, नशके लढण्यास काळही अग्रीं८६

*मग अल्ली सिद्धि जोहारास पाठविता.*

होता शिवजि पन्हाळ्यावर, त्याला वेढिलें चहूंकडुनी ॥
संकट पडलें त्यातें, धान्यादीची बहूत तुट पडुनी ॥८७॥
तेव्हां नम्रपणानें, शिवजी आकार संधिचा[3] घाली ॥
झाला कर[4]गत[5] रिपुही, तैं बुद्धी मूढ वैरियां झाली ॥८८॥
गर्वें झाले शिथिला-दर जींहीं घातला असे वेढा ॥
भुलवी त्यां नृप जेवीं, भुलवावें देउनी मुलां पेढा ॥८९॥

*तो पन्हाळ्याला वेढा घालितो.*

ऐसे बेसावध ते, रिपु जाले पाहुनी त्वरें आला ॥
खालीं भूप गडाच्या, रात्रींच जाउनि मिळे स्वसैन्याला९०
गेला कळतांच असें, मागुनि त्या वैरिवाहिनी[6] धांवे ॥
बाजीपरभू तीच्या, प्रतिबंधकते[7] नगापरी[8] पावे ॥ ९१ ॥
त्या शूरें बाजीनें, रिपुसैनिक सोडिले करुनि जेर ॥
मारा न सोसवे तैं, करितें झाले सलज्ज मनि जे[9] र[10] ९२

*त्याला फसवून शिवाजी स्वसेनेस जाऊन मिळतो.*

---

१ विजापुराच्या. २ पायदळ. ३ तहाचा. ४—५ शिवाजी हस्तगत झाला असी. ६ शत्रुसेना. ७ प्रतिबंधकतेप्रत. ८ पर्वतासारिखा (आडवा आला असें तात्पर्य.) ९ यवन. १० रोदन.

[illegible] मग नचि केवळ विजयश्री, घाली स्वाम्यर्थ जीवदात्याला[1] ॥
[illegible] परि अप्सराहि बाजी-वीराला, वरणमालिका त्याला॥९३
ऐकुनि निधन तयाचें, बोले होउनि नृपाळ तो कष्टी॥
गतसंपत्ति मिळे परि, नचि ऐसा शूर शोधिल्या सृष्टी ९४
[illegible] खवळुनि कृतांतसा नृप, मारितसे यवनसैन्य तो युद्धीं॥
[illegible] करुनि पराक्रम तेणें, निजशौर्यें शीघ्र पळविला[2] सिद्धी॥९५
[illegible] जाणुनि अल्ली यापरि, शिवरायें जिंकिलें स्वसिद्दीस ॥
[illegible] स्वयमेव युद्धयात्रा, करण्याच्या तो धरीत बुद्धीस ॥९६॥
घेउनि अपार सेना, समागमें तो शिवास जिंकाया ॥
बलिष्ठरिपुवैरजनित[3], ज्यांची जाळीत काळजी काया॥९७
कांहीं स्वकीय किल्ले, युद्ध करुनि घेतले परत यवनीं ॥
व्याघ्र नसे जवळीं तें, जंबुकगण दावितो स्ववीर्य वनीं॥९८॥
[illegible] अतिकोपें खवळे नृप, युद्ध करुनि दुर्ग घेत तो परत ॥
[illegible] ज्याचें चित्त सदोदित, गोविप्रांच्याच रक्षणीं निरत॥९९॥
[illegible] बाजी घोरपडा जो, करी शहाजीस कैद कीं त्यास ॥
[illegible] तद्ग्रामासह जाळुनि, नृपाळ दे तोष ती निजपित्यास १००

## श्लोक.

[illegible] वाडीच्या सवितांचा मुलुख निजबळें घेत राजा शिवाजी,
[illegible] ज्यांचे दुर्धर्ष हस्ती, पदग, निजजवें वायुजेते हि वाजी ॥

१. जीवाचें अर्पण करणाऱ्याला. २. या क्रियेचा कर्ता नृपानें हा [illegible] आहे. ३ बलिष्ठ शत्रूच्या वैरापासूनि झालेली. हें काळ[illegible] विशेषण. ४ अलीची. या षष्ठीचा संबंध काळजीसीं. ५. हा [illegible] आहे. ६ घोरपड्याचें गांव मुधोळ, त्यासुद्धा. ७ शिवाजीचे. ८ [illegible] जिंकणारे. ९. घोडे.

आले ते[1] शेवटीं त्या, शरण मग तया स्थापि तो[2] तत्पदींच,
श्रेष्ठत्वा थोर देती, नर शरण रिघे तो जरी फार नीच[4] १०१

**आर्या.**

रविच्या प्रचंड तेजें, इंदु जसा हीनकांति होत असे ॥
तैसा शिवप्रतापामुळें यवनराज हीनतेज दिसे ॥१०२॥
द्वेषा[5] चालविता मद्राज्या घेईल सर्व जिंकुनियां ॥
ऐसें जाणुनि यवन, क्षितिपति धरि मानसीं अर्पिन्मया[6] १०३
मग तो संधी[7] करितो, झाला देवुनि शिवास करभार ॥
मस्तक सहजचि लववी, पडतां त्यावरि गरिष्ठ नरभार १०४

अशी बादशाह हा खंडणी देऊन शिवाजीशीं तह करितो.

**श्लोक.**

उठे लोकीं वार्त्ता न कधिं करभार क्षितिवरी,
समर्पीला हिंदूप्रति यवनराजें अजवरी ॥
मनुष्यानें रक्षःपतिस हरिलें युद्ध करुनी,
कथा पौराणीही शिवजि अजि सत्या करि जनीं ॥१०५॥

**आर्या.**

ऐशा वीजपुराच्या, यवननरेशा पराक्रमी शिवजी ॥
जिंकी यन्नीति असे ख्यात जनीं करितसे प्रजाशिव जी १०६
शिवरायें वाढविलें, समुद्रतटिं फार थोर अरमार ॥
ज्याचे दर्यासागर, मैनाक् भांडारि, दोन सरदार॥१०७॥

तो अरमार वाढवून त्याचे दोन सरदार करितो.

---

१ वाडीचे सावंत. २ शिवाजी. ३ त्याच्या स्वतःच्या राज्यावर ४ नीच ही शरण आला तरीं त्याला थोर नर श्रेष्ठस्था देती. ५ पुढें द्वेष चालविला तर. ६ फार विनयानें. ७ तह. ८ खंडणी. ९ फार जड. हें भाराचें विशेषण. १० मनुष्य. लववी याचा कर्ता. ११ राक्षसांच्या राजास (रावणास.) १२ पुराणांतली जुनी. १३ हें कथेचें विशेषण. १४ ज्या शिवाजीची नीति. १५ प्रजाकल्याण. १६–१७ हीं नामें. येथें होते हें क्रियापद अध्याहृत आहे.

**श्लोक.**

तो फिरंगी लोकांस भय उत्पन्न करितो. ते लोक त्यास भिऊन त्याची मर्जी संपादितात.

फिरंगी गोव्याचे बहुत शिवराया दचकती,
सदा नम्रभावें करुनिच तयासीं विचरती ॥
अपूर्वा वस्तूतें विपुल युरपांतीलहि तया,
समर्पूनी घेती करुनि निजे लोकांवरि दया ॥१०८॥

**आर्या.**

तो रायगडीं रहायास जातो.

रेडीनामक दुर्गा, रायगडचि ठेवि नाम शिवराय ॥
राजगडाहुनि तेथें, राहाया नरपती स्वयें जाय ॥१०९॥
तेथें थोर हवेल्या, बांधुनियां राजधानि ती केली ॥
जीचीं सुंदर मंदिरवृंदाग्रें, इंदुमंडळीं गेलीं ॥११०॥

शहाजी हा शिवाजीला भेटायास येतो.

भेटाया स्वसुतातें, आला मग शाहजी बहू तोषें ॥
दर्शनजलयोगें यत्प्रेमलतासंतती अतीपोषे ॥ १११ ॥

**श्लोक.**

शहाजी तो कांहीं दिवस तंव राही सुतघरीं,
जयींच्या आनंदाब्धिस वरिवरी येति लहरी ॥
न त्या मातीं पोटीं ह्मणुनि नयनांतूनि गळती,
तयांना अज्ञांनी न समजुनि अश्रूच ह्मणती ॥११२॥

**आर्या.**

प्रतापगडावर तुळजापुरच्या देवीची मूर्ती स्थापितो.

प्रत्यब्दीं न बने त्या, जाया तुळजापुरी भवानीच्या ॥
दर्शन कार्यार्थ जिची, दया करी थोर मानवा नीच्या ११३

---

१ युरोपखंडातील, हें वस्तूचें विशेषण. २ पोर्तुगीज् लोकांवर. ३ शिवाजीतें. ४ दर्शनरूप जलाच्या योगानें. ५ ज्याचे प्रीतिरूपवेलीचा विस्तार. ६ शिवाजीच्या घरीं. ७ ज्याच्या आनंदसमुद्रास. ८ लाटा. ९ लाटांतीं. १० अजाणते लोक. ११ न जाणतां. १२ दरसाल. १३ बनेना. १४ या षष्ठीचा संबंध दर्शन कार्याकडे. १५ हलक्या मनुष्याला ही थोर करी असा संबंध.

ह्मणुनि तयेची[1] मूर्ती, करुनी, स्थापी मेहा[2] समारंभा ॥
प्रतापगिरिवरि लाजे, यद्रूपा पाहुनी मनीं रंभा[4] ॥११४॥
भूपें[5] विजनवनस्थित[6], केला गुरु, रामदास साधू तो[7] ॥
देहा जलसा[8] यत्कृत[9] बोध जनीं, मलिनमानसा[10] धूतो॥११५
एके दिनीं ह्मणे नृप, गुरो करावें पवित्र गेहा[11] जी ॥
दास ह्मणे ईशेच्छे, घडणें, तेंव्हा घडेल नच आजी॥११६॥
ज्याचा तात असे सदाशिव कृती माता सती पार्वती,
गांव त्र्यंबक हें गणेश अभिधा लेले उपाख्याहि ती॥
त्याणें हें शिवराज काव्य रचिलें, त्यांतील हा पांचवा,
सर्ग श्रेष्ठ विलोकुनी निजमनीं भावामृता सांचवा ११७

तो रामदास स्वामीला गुरु करितो.

पुढें तुझ्या घरीं येणें होईल असें शिवाजीला रामदास सुचवितात.

ह्या प्रकारें हा श्रीशिवाजिचरित्राख्यकाव्याचा पांचवा सर्ग समाप्त झाला.

---

# ॥ अथ शिवाजीचरित्रषष्ठसर्गप्रारंभ ॥

---

श्लोक.

जिंकोनी बीजपूर्नायक मग शिवजी मोंगला तें जिणाया[12],
सेनेची सिद्धता तो त्वरित करितसे येइना जी[13] गणाया॥
पत्तीचे[14] और हत्ती मदयुत हयही ती असी थोर सेना,
चाले तेंव्हां रजांनीं गगन भरुनियां सूर्य तोंही दिसेना १

विजापुरकरास जिंकल्यावर शिवाजी मोंगलावर स्वारी करितो.

---

१ भवानीची. २ मोठ्या समारंभास करुनी असा संबंध. ३ जीच्या रुपाला. ४ एकेअप्सरेचें नांव. ५ शिवाजीनें. ६ निर्जन अरण्यांत राहाणारा. ७ रामदास नावाचा प्रसिद्ध साधु. ८ पाणी जसें शरीराला. ९ ज्यानें केलेला बोध. १० मळलेल्या मनाला. ११ घराला. १२ जिंकाया. १३ सेना. १४ पायदळाचे समुदाय.

*तेव्हां अवरंगजेबास मोठी काळजी लागते.*

तीनें स्वारी करोनी मुलुख बहु तदा जिंकिला मोगलांचा,
तेव्हां दिल्लीपतीही धरित शिवजिंच्या धाक चित्तीं बळाचा॥
तेव्हां पासून त्याच्या मनिं निपजतसे फार मोठाच आंधी,
ज्याच्या नाशार्थ युक्ती बहुत करित तो सोडुनी सर्व आंधीं॥२

*तो शाईस्तेखानाला शिवाजीवर योजितो तो चाकणेला वेढा घालितो. फिरंगोजी हा तेथचा अधिकारी होता. तो मोठी लढाई करितो. त्याचे सर्व लोक पडले तरी तो एकटाच युद्ध करितो.*

षाइस्तेखाननाम्यापतिं मनुजपती दिल्लिचा तो शिवाजी,
जिंकाया धाडि हत्ती,पदग अणि तसे देउनी त्यासि वाजी॥
येवोनी तो पुण्याला चहुंकडुनि वळें वेढि जैं चाकणेला,
फिरंगोजी दुर्गपाळ प्रबळ बहु तदा सिद्ध युद्धास जाला॥३
झालें तुंबळ युद्ध त्या उभयतांचें जें विलोकून रे,
घेईजे बहुमानसांत धडकी धीरें हि वीरें नरें॥
मेले फार करोनि सेवक तरी फिरंगोजि तो एकला,
हातीं शस्त्र धरोनियां अचलसा युद्धीं उभा राहिला॥४॥

### आर्या.

*खान त्याला आदरानें आपल्या पक्षास बोलावितो पण तें न ऐकतां तो शिवाजीला जाऊन मिळतो.*

त्याच्या अद्भुत शौर्या, विलोकुनी विस्मयें करुनि खानें॥
युद्धा सोडुनि त्याला, पाचारुनि आणिलें जवळ मानें॥५
बहु आदरें म्हणे त्या, अमच्या पक्षास जरि तुह्मी याल॥
तरि अस्मत्स्वामीच्या, पासुनि अधिकार थोर पावाल ६
फिरंगोजी उत्तर दे, शिवपद दासाचिया हि दासाचें॥
पद बहुमान्य मला हो, मपुन्हा इंद्रत्वही दिलें साचें॥७॥
खानें त्याला दिधलें, वस्त्रालंकार बहुत मोलाचे॥
परि तो स्पर्शोहि नत्या, न सत्यसेवक कदापि वश लांचे॥८

---

१ याचा संबंध बळाशीं. २ काळजी. ३ साऱ्या गोष्टी. ४ पूर्वी (सोडून) ५ विजापूरचा पाळाय (पास) ६ शिवाजीला. ७ चाकण किल्याचा अधिकारी. ८ पर्वतासारखा. ९ सानानें. १० बहुमानपूर्वक. ११ आमच्या यजमानापासून.

खानें दिधला मग त्या, निरोप अपल्या प्रभूकडे जाया ॥
तेव्हां तो येऊनियां, वंदितसे शिवनृपाचिया पायां ॥ ९ ॥
स्वाम्येकनिष्ठता अणि, शौर्य तयाचें विलोकुनी फार ॥
सन्मानूनि शिवाजी, देई मोठा तयास अधिकार ॥ १० ॥

शिवाजी फिरंगोजीला मोठा अधिकार देतो.

### श्लोक.

पुण्यांत निजमंदिरीं वसत खान ऐसें तदा,
शिवाजी समजोनियां निघुनि रात्रिचा एकदा ॥
पुरीं शिरुनि एकटा कुटि तयास त्याचा तसा,
वधूनि सुत येई तो करुनि यावरी साहसा ॥ ११ ॥

पुण्यांतील शिवाजीच्या वाड्यांत खान उतरला होता तेथें जाऊन शिवाजी त्याला जखमी करितो.

### आर्या.

प्रातःकाळीं कोपें, आला युद्धार्थ खान खवळूनी ॥
पुच्छीं पद पडतां अहि, पाहे जैसा डसावया वळुनी ॥ १२ ॥
गजहयपत्तीत्यादिक, आलें घेवोनि सैन्य शस्त्रांस ॥
रणवाद्यांच्या घोषें, होई शूरांसही तदा त्रास ॥ १३ ॥

सकाळीं खान युद्धार्थ येतो.

### श्लोक.

हिंदूच्यांनीं होय कैंची लढाई, ऐसी वाटे मोंगलांतें बढाई ॥
जाणोनी हे भूपती सूक्ष्मदृष्टी, तोफांची तोतें करी थोर वृष्टी १४

खानाचें व शिवाजीचें युद्ध होतें.

### आर्या.

खानाकडील सेना, वेगानें, निजरिपूवरीं धांवे ॥
तंव तो निजहानीला, दीपापासुनि, पतंगसा पावे ॥ १५ ॥
पडती मेघापासुनि, अनिवारपणें, निरंतरा गारा ॥
तैसा शिवसेना करि, गोळ्यांचा, वैरियांवरी मारा ॥ १६ ॥

---

१ खानाचा मुलगा ठार मारुन. २ शेंपटावर. ३ साप. ४ हत्ती, घोडे, पायदळ. ५ खान हा स्यनाशाला. ६ दाट.

श्लोक.

तोफांचा भडका बघोनि धडका घेती रिपू तें मनीं,
युद्धक्षोणि तजोनि तत्क्षणिंच ते जाती पळोनी वनीं ॥
दारूचा धुर धूळजी उधळली सूर्या तिहीं झांकिलें,
ऐशा गर्दिमधीं शिवें बहुविधीं शस्त्रीं रिपू मारिले ॥१७॥
हत्ती धांवति भीतिनें भडकले घोडे रिपूंचे त्वरें,
मारा तो अनिवार देखुनि तयां अंगीं भरे कापरें ॥

शिवाजी हा शरणागतांस रक्षितो.

जे आले चरणाप्रती शरण, जे दांतीं धरीती तृणा,
त्यांनां तो शिव तत्क्षणीं अभय दे चित्तीं धरोनी घृणा १९

त्वानाच्या सेनेची दुर्दशा.

कोणाचीं तुटलीं शिरें कितिक ते छिन्नांघ्रि जाले रणीं,
कोणाचे तुटले करद्वय तसे तीक्ष्णीं शरांच्या गणीं ॥
कोणाचें फुटलें उरस्थल असी लागोनियां तेथुनी,
चाले शोणितपूर तें भडभडां जैसी जलाची धुनी ॥२०
लागोनीं जखमा रणांत पडले प्याया जला मागती,
कोणाचे उरले असू नयनिं ते दीनापरी पाहती ॥
कोणी पाठ करूनि लागति पळूं तैं शस्त्र लागोनि रे,
कल्थी खाउनि पालथे पडति ते होती बहू घाबरे ॥२१॥
गोळे लागुनि मत्त हत्ति पडती तेव्हां धरित्रीवरी,
वज्राघातवशें धराधरपती जैसे क्षणाभीतरीं ॥
त्याखालीं दडपोनि पायदळ तें चेंदोनियां जातसे,
हाडें तेचि खडे अशुद्ध चिखलस्थानी जनांतें दिसे ॥२२॥
शस्त्रा लागुनि शस्त्र अग्निहि पडे तें जाळ पाहोनियां,
घोडे धांवति बापडे चहुंकडे तैं पावुनीयां भया ॥

१ भीति. २ पाय तुटलें. ३ दोन्ही हात. ४ तरवारी. ५ रक्ताचा पूर. ६ नदी. ७-८ डोळ्यांत प्राण उरले. ९ मोठमोठे पर्वत. १०-११ रक्त तोच चिखल.

खारा पाडुनि खालतीं तुडविती त्याला पदाच्या तलीं,
खाली, यापरि युद्ध दारुण शिवें केलें न जाला तुलों॥२३

काटोंजी गुजर एक ह्मणूनि होता,
सेनानी नरपतिच्या[4] रिपूंस जेता ॥
तो जेव्हां बहुतचि मोंगलास मारी,
भासे जो[5] तंव समरीं तयांस[6] मारी[7] ॥ २४ ॥
ऐसें भूपें जिंकिले मोंगलातें,
नाहीं कोठें साम्य ज्याच्या बलातें ॥
शत्रुव्रातां[8] घालवी जो दिगंतीं,
त्याच्या[9] संगें देऊनी स्वीयकीर्ती ॥ २५ ॥

शाइस्तेखान ऐसेपरि शिवनरपें जिंकिला स्वप्रतापें,
दिल्लीशें[10] ह्या[11] उदंता परिसुनि मरातो मानसीं फार तापें॥
त्यानें सुलतान मावुस ह्मणुनि नरवरा धाडिलें दक्षिणेत,
त्यालाही भूप युद्धीं निजभुजबल तें पूर्ववत् दाखवीत॥२६॥
जैसीका अलका[12] समृद्ध अथवा विख्यात लंकापुरी,
तैसी सूरतनामिका सुनगरी होती तदा साजिरी ॥
तेथें जाउनियां जवाहिर तसीं रत्नें प्रयत्नें निधी,
द्रव्याचे[13] अणिले नृपें शिवजिनें हारोनि लक्षावधी ॥२७॥

न मर्त्यलोकीं[14] किमपी असे स्थिर,
संपूर्ण वस्तू दिसताति नश्वरें[15] ॥

मग अवरंगजेब सुलतान माजुमास योजितो त्याला, हा शिवाजी जिंकितो.

शिवाजी सुरत लुटतो.

शहाजी मृत्यु पावतो त्यावर उत्प्रेक्षा.

---

१ याचा संबंध खालीं याकडे. २ उपमा. ३ सरदार. ४ शिवाजीचा. ५ काटोंजी गुजर. ६ मोंगलास. ७ महामारी. ८ शत्रुसमुदायास. ९ शत्रुव्रातासह. हा सहोक्त्यलंकार. १० अवरंगजेबानें. ११ वृत्तांतास. १२ कुबेराची पुरी. १३ याचा अन्वय निधीशीं. १४ मनुष्यलोकांत. १५ नाशिवंत.

जाणोनियां हेंचि शहाजि संभ्रमें,
अमर्त्यलोकाप्रति जाय हें गमे ॥ २८ ॥
करी जसा राघवतीं पित्याची, तसी क्रिया भूप करीत त्याची॥
केले बहू दान व धर्म त्यानें, तो त्याचिया सद्गतिला पित्याने २९

**आर्या.**

पितृत्तरकार्य करुनि, लागे पुनरपि नृपाळ जिंकाया ॥
शत्रुव्रात ज्याची, जाळी अनिवार, काळजी काया॥३०॥
[illegible] अम्मदनगरा जाउनि, वैऱ्यांना भूमिपें बहू कुंटिलें ॥
तैसे त्यांचें सर्वहि, धनकनकादिक निजेंबळें लुटिलें॥३१॥

**श्लोक.**

[illegible] गोंव्याच्या दक्षिणेला सधन बहु असे बारशीलोरपूर,
जेथें होते धनाचे निधि अगणित ते होनहि हो अपार ॥
तेथें सामुद्रसेनेसह नृपति जवें जाय नौकाधिरूढ,
होवोनी जिंकि त्याला तंव रिपु लपती पाहुनी स्थानगूढ ३२

**आर्या.**

संपत्ती आणिलीसे, तेथुनियां हारुनी नृपें चतुरें ॥
भग्नमनोरथ होती, रिपु ज्याची ऐकुनी रणस्थतुरें ॥३२॥
[illegible] जयसिंह दिलिरखानहि, ऐसे दोघे नवीन सरदार ॥
दिल्लीहूनि अले त्या, जिंकाया सैन्य घेउनी फार ॥३३॥
त्यांहीं कांहीं दिवसहि, करुनि विचारा बघोनियां संधी[9] ॥
शिवराय भूपतीसीं, केला युद्धा त्यजूनियां संधी[10] ॥३४॥

---

१ स्वर्गीस. २ रामचंद्र. ३ दशरथाची. ४ शहाजीची. ५ पित्यांनीं ( [illegible] ) ६ शिवाजी. ७ हें क्रियापद. ८ रणवाद्यें. ९ अवसर ( [illegible] ) १० तह.

कपटादरेंचि दिल्लीपति त्या नेई निजात्मजासहित ॥ अवरंगजेब हा शिवाजीला पुत्र सहित कपटानें दिल्लीस नेतो.
स्वपुरा, दुर्योधनसा, धर्मा वंचूनि साधण्या स्वहित ॥३५॥
दिल्लीपुरास गेल्या-वरि त्याला, समजलेंचि कृत्रिम तें ॥
दुष्टाच्या वचनीं विश्वासार्पण हें अयोग्य शिष्टमतें ॥३६॥

शाठ्यं शठीं या न्यायें, वंचोनी भूप दिल्लिपतिलाही ॥ त्याला फसवून शिवाजी परत स्वदेशीं येतो.
गेला, समजुनियां हें, जाली तत्काळ, शत्रुची लाही॥३७॥

सैन्यीं उत्तेजन ये, येतां तो भूपती स्वगेहास ॥ त्याच्या येण्यानें त्याच्या सेनेस उत्तेजन येतें तें सदृष्टांत.
चैतन्यांगमयोगें, येतें जेवीं गतासु देहास ॥ ३८ ॥

मग तो नरेश बहुतचि, चित्तीं काळाग्निरुद्रसा खवळे ॥ मग तो शिवाजी अत्यंत कोपायमान होऊन.
वाटे सकळ हि आतां, रिपुलोकां ग्रासिल क्षणांत बळें ३९

गजहयपत्त्यादिक, अपार करि सिद्ध भूप सैन्यास ॥ शत्रूस जिंकायास निघतो तो प्रकार.
यद्गणनार्थ पुरेना, गणकाचा अल्प अंकविन्यास॥४०॥
मदमत्तहस्ति ज्याच्या, सेनेंतिल भासती क्ष्माधरसे ॥ हत्तींचें वर्णन.
वर्षाकाळींपरि यन्मस्तक भिजलें, सदैव दानरसें ॥४१॥
यैर्जंघाल तुरंगमसंघ बहुत चांगला तैंयां गमला ॥ घोड्यांचें वर्णन.
लपला वास्तव नाकीं, वाटे उच्चैःश्रवा तुरंग मला ॥४२॥

---

१ अवरंगजेब. २ त्याच्या पुत्रासुद्धां. ३ दिल्लीस. ४–५ धर्मराजाला दुर्योधनानें वंचिलें तसा. ६ शठेशाठ्यंसमाचरेत् असा न्याय आहे. ७ अवरंगजेबाला. ८ सेनेला. ९ शिवाजी. १० जीवयेण्यानें. ११ मेलेल्या देहास. १२–१३ शिवाजी. १४ गणित. १५ पर्वतासारिखे. १६ पर्जन्यकाळीं. असे ज्याप्रमाणें. १७ ज्यांची डोकीं. १८ मदोदकानें. १९ ज्याचे वेगवान घोड्यांचा समुदाय. २० उच्चैःश्रव्याला.

### श्लोक.

[illegible]चे वर्णन. भाला बंदुक वा करांत, पगडी माथ्यास, जोडा
आंगी आंगरखे रुँदार, कसिती शेले सुरंगी कंदी
कल्लेदार मिशा मुखीं विलसती भव्याकृती जे नर,
तेच स्वार हुशार फार बसले मोठ्या तुरंगावर ॥४
[illegible] काच्यानें कटि बांधिती कसुनियां बंड्या अंगीं शोभ
[illegible] हेटकरी व जेठी मल्ल तसे अरुंद ढवळे ते चोळणे घालिती
[illegible]. हातीं त्या तरवारि ढालि, बहुधा कोणी कमानी क
घेती तीर हुजा, अवाज करिती जातां अरातीवरी ॥
ऐसे हेटकरी नृपा अवडती तैसेच ते मावळे,
हुद्दे देउनियां दळांत अणिले स्वार्थी जसे कावळे
मोठ्या दुर्गमहावनांत विकटस्थानीं सदा जावया,
हौशी चंचल शूर उग्र समरीं शत्रूस जिंकावया ॥४

### आर्या.

ऐसा दलभार अमित, चाले तंव भूमि हे भरें हाले
तेव्हांच डोंगराचें, भूँधर हें नांव सार्थकीं जालें ॥४
[illegible] सेनानायक भीमार्जुनसम ऐसे महाप्रबळ जे ते ॥
[illegible]. संगें शिवनृपतीच्या, निघती युद्धांत कालदळजेते ॥
यैच्छस्त्रांची कांती, पाहुनि दिसती खरे खराब हिरे
यैत्सिंहनाद करिती, क्षणांत अरिसैनिकें धँरां बहिरे॥४
प्रबळा वैरिदळाला, गांठुनि तो नृप करीत संगर ह
रिपुजीवहरणकौशल, जाचें पाहुनि मनीं ह्मणे गरें हा॥

१ कापूस घातलेले. २ कंदी रंगाचे. ३ भूमीला धर
४ अन्वर्थ. ५ ज्यांच्या शस्त्रांची. ६ ज्या सैनिकाचे सिंह
([illegible]) ७ शत्रु सरदारास. ८ शत्रूचे जीव घेण्याचें कुश
९ [illegible] हाय खाणे.

गजगज हयहय पत्ती, पत्ती ऐसे परस्परें भिडती ॥
चिडती कोपें झाली, दुर्भेद्या वायुला हि तैं भिडती॥५०॥
ज्याचा शस्त्रनिकर[2] रिपुमस्तक उडवी रणांत कंदुकसे[3] ॥
त्या म्हणतील न वैरी, कीं हा प्रत्यक्ष कालबंधु कसे॥५१॥
यवनेशा माराया, धांवे नृप जेवि गरुड सापाला ॥
उधळलि तैं रिपुसैन्यें, वात्यायोगें उडे जसा पाला॥५२॥
मग सारे रिपुसैनिक, भिळुनि करूं पाहती शिवा तुच्छ ॥
तंव तो अधिकचि खवळे, न डसे कीं साप तुडविल्या पुच्छ ५३
रिपुभट सकळ मिळुनियां, आले तैं निजपतीस राखाया॥
तंव शिवपंचानन[6] तो, धांवे यवनेशसिंधुरा[7] खाया ॥५४॥
यवनेश तोचि करिवर, शिवभूपति तोचि पंचवदन खरा ॥ युद्ध प्रकार.
या रूपकीं न कल्पिल, कोणं शिवायुधगणा करी नखेरा ५५
मत्तमतंगजयूथीं, पंचानन वा अजांत वाघ शिरे ॥
तैसा वैरिगणीं शिवभूप शिरोनी खुडी तदीयशिरें[17] ॥५६
संपूर्ण शत्रुसेना, लोटे शिव भूपतीवरी जमुनी ॥
ती तों अगाध सागर, त्याला नृप होतसे अगस्तिमुनी॥५७॥
रणमंडलांत तळपे, भूप जसा तो नभांत वारमणी ॥
झाल्या गतप्रभा तैं, रिपुसेना जेवि इंदुच्या[21] रमणी[22]॥५८॥

१ दाटी. २ शस्त्रसमुदाय. ३ चेंडूप्रमाणें. ४ यमाचे भाऊ. ५ मोठ्या वाऱ्यानें. ६ शिवाजी हाच सिंह. ७ यवनेश तोच हत्ती त्याला खाण्याला. ८ मोठा हत्ती. ९ सिंह. १० कोणता कवि. ११ शिवाजीच्या शस्त्रास. १२ नखें. १३ मस्त हत्तीच्या समुदायांत. १४ सिंह. १५ मेंढ्यांत. १६ शिवाजी राजा. १७ शत्रूंचीं डोकीं. १८ अगस्तिऋषि. (यानें समुद्र पिऊन टाकिला असी पुराणप्रसिद्धि आहे. १९ आकाशांत. २० सूर्य. २१ चंद्राच्या. २२ तारा.

शस्त्रें वीरकरींचीं, प्रकाशती परमतीव्र तेजाळ ॥
अपट्टुनि परस्परांवरि, उठती गगनांत थोर ते जाळ॥
धडधड तोफांचा ध्वनि, ऐकुनि भेणें तुरंग धडफड
तंव आरूढ मनुज ही, वेगानें वरूनि खालतीं पडती
शस्त्राहत रिपु माहत, पडती गंडस्थळीं सवेग गती
निजपीडा हरणार्थचि, जाणों मदगंध हुंगण्या लवत
पुढले पाय करूनि वर, मागिल पायांवरी उभे वाज
घाय नलागो स्वारा,ह्मणुनिचजणुं करिति तेअसी अ
प्रबळहि अरिसेनेतें, मारी तो भूमिपाळ जोरानें ॥
जैसा दावानळ बहु, गहनें ही जाळितोच जो रानें॥
छेदी वैरिगणा शिव, जैसा कुलिशायुध क्षितिधकुळ
तंव ते तुरुनिच पळती, जैसे का सर्प पाहतां नकुळ

### श्लोक.

उन्हाळ्याचा सूर्य प्रखर शिवभूपाळ गमला,
रिपूंची हारी जो निजकरवशें जीवनकळा ॥
शरांचा पर्जन्य प्रबळ रणभूमीवरि करी,
असृग्द्राची वाहे भयकर नदी तैं सलहरी ॥ ६५
असृग्द्राचें पाणी करिवरशिवें तेचि मगर,
तयांच्या जा सोंडा तुटुनि पडल्या ते फणिवरें ॥

[illegible]

१ [illegible] हणिलेले माहूत (ही हत्तीचे मस्तकावर पडण्या[illegible] [illegible] आहे. ) २ लढाई. ३ इंद्र. ४ पर्वतसमुदा[illegible] [illegible]. ६ आपल्या किरणयोगें. पक्षीं. खंडणीच्यायो[illegible] [illegible]. ८ रक्ताची. ९ लाटायुक्त. १० र[illegible] [illegible]. ११ हत्तींची मढी. १२ सुसरी. १३ हत्तीच्या सों[illegible] [illegible].

कचांची शेवाळी, सुनरवदनें तींच कमळें,
नदी ऐसी वाहे प्रकट रणभूमींतुनि बळें ॥ ६६ ॥

साकी.

विजापूर आणि गोवळकोंडें, तैसें दिल्लीपूर ॥ — शत्रूंचा पराभव.
येथिल नृपती जेर करूनी, सोडी ते[4] जारि शूर ॥६७॥

श्लोक.

ऐसे मोगल यावनादिक रिपू जिंकीतसे भूपती, — उपसंहार दिग्विजयाचा.
ज्याचें नामचि ऐकतां थरथरां ते भीतिनें कांपती ॥
तो घेई करभार फारचि तयांपासूनि मोठ्या हटें,
सद्रत्नादिक आणि जें धन बहू, तें मोजवेना धटें ॥६८॥
ज्याचा तात असे सदाशिव सुधी माता सती पारवती,
गांव त्र्यंबक हें गणेश अभिधा लेके उपाख्याहि ती ॥
त्यानें निर्मियलें शिवाजिवरि जें काव्य श्रमानें महा,
त्याचा सर्ग निसर्गसुंदर असा हा साहवाही पहा ६९

ह्या प्रकारें ह्या श्रीशिवाजीचरित्राख्यकाव्याचा षष्ठ सर्ग समाप्त झाला.

# अथश्रीशिवाजीचरित्रसप्तमसर्गप्रारंभ.

श्लोक.

ऐशा दिग्विजया करूनि परते तो मागुती भूपती, — दिग्विजय करून शिवाजाची स्वारी माघारी फिरते.
शस्त्रें हातिं धरोनि वीरमणि ते जा भोंवती चालती ॥

१–२ केश तेच शेवाळीं. ३ याचा कर्ता शिवाजी हा अध्याहृत आहे. ४ दिल्ली वगैरेचे राजे. ५ शिवाजी. ६ बळानें. ७ मोठ्या तराजूनेंही मोजवेना. ८ स्वतांराज्य. ९ वीरश्रेष्ठ.

घोडेस्वार, पदाति, हाति बरवे संख्या जयांना नसे,
तो कुंतीसुतअर्जुनापरि तदा स्वीया प्रजातें दिसे ॥ १ ॥
खंडोजी जगताप, बाजि जळगे तान्हाजि शिर्के महा,
संभाजी तळगे, पिलाजि सणसे, सूर्याजि काळे पहा ॥
चांगाजी कडु, बांगराव ढवळे, नेमाजि शिंदे, तसे,
हांडे, ठाकुर, पारठे, मळधडे, डोळे, धमाले, असे ॥२॥
संभाजि, कावजि, बुवाजि, पवार शूर,
केरोजि, देवजि, धनाजि, सयाजि वीर ॥
बाजी, मुरार, बिठुजी, कडु, हाडकार,
दादाजि बापुजि, हिरोजि, इदाजि पीर ॥ ३ ॥
भीमाजी जिवजी, मुधोजि गणजी, रामाजि दारेकर,
बाबाजी प्रभु, येसजी, चिमणजी बापू महार्णावर ॥
नागोजी फरजंद, बाळजि, अरेरावाख्य, पाठेकर,
कोकाटे, भगवानराव, हरजी राजे तुळाजी कर ॥ ४ ॥
रायाजी, गडधे, हिराजि सळके, येसाजि खांडेकर,
कान्होजी भंगरे, तुकोजि उचले, जेसिंग पालेकर ॥
कृष्णाजी कडु, कांकडे, भुजबळी, संताजि, ते भोसले,
इत्यादी सरदार लोक विभुच्या स्वारी सवें चालले ॥ ५॥
ज्यांच्या पाठिवरीं मृदू नवझुली सकलादिच्या घातल्या,
घंटा दोनहि बाजुला करिती त्या नादा गुंणीं बांधिल्या ॥
हातीं अंकुश घेउनी सुरुचिर स्कंधीं सुखें बैसले,
माहूत प्रभुच्या मतंगज असे स्वारीपुढें चालले ॥ ६ ॥
तंगानें कसिले जपूनि बरवे खोगीर पाठीवरी,
[illegible] त्यावर दारदार झुडिवा चौफेर तो भर्जरी ॥

---
१ काहाडण्यानीं.

तोंडामाजिं लगाम तीक्ष्ण अणिचा, सोनेरि माळा गळीं,
आघाडीस सजूनि चाललि असी तें बाजिची मंडळी ॥७॥
कितिक्षिति[१] अह्मास ही ह्मणुनि गर्वयोगें अहा,
अति प्रजव बाजिनीं उधळिली धुळी तें महा ॥
मनीं जणुं अणून कीं जलधितें भरावें हिनें,
मिळेल मग चालण्या जमिन फार या रीतिनें ॥८॥

घोड्याच्या योगानें धूळ उडाली तीवर उत्प्रेक्षा.

आर्या.

फडफडती वाऱ्यानें, ध्वजा निशाणें, तसा जरीपटका ॥
यद्योगें आलीसे, बहुतचि शोभा, नृपाचिया कटका[२] ॥९॥

निशाणें व जरीपटका.

ऐशा थाटानें तो, स्वस्थाना पातला, जईं नृपती ॥
तेव्हां प्रजा तयाचा, प्रेमें नीरांजनाविधी[३] करिती ॥१०॥

शिवाजीस आरती करितात.

आतां कोठें कीजे, मुख्य स्थल आपणा रहायास ॥
ह्याचा विचार मग तो, शिव नृपती लागला करायास॥११॥

तो स्थळविचार करितो.

श्लोक.

प्रांतीं[४] शेतकरी बहूत करिती शेतांत साळी गहूं,
शाळू नागलि बाजरी हरभरे ज्वारी वटाणे बहू ॥
बागाईत जमीन तींत मिरच्या, वांग्या, दुधे, भोपळे,
काळा ऊंस रसाळ, मेथि, चवळी, भेंड्या, गवाऱ्यागुळे ।१२।

जेथें उत्तम धान्ये वगैरे होतात.

मोटांच्या विहिरी विशाळ व चिरेबंदी सुध्या बांधिल्या,
झाडें भोंवति लाउनी दिनकरच्छाया[५] बऱ्या साधिल्या ॥
मोटेनें वर पाणि नेत असतां ललकारिती ते बळें,
माळी भूशकलें[६] जळें भिजविती शोभाढ्य ऐसे मळे॥१३॥

जेथें बागाईत असते.

---

१ थोडी जमीन. २ सैन्याला. ३ आरती ओवाळणें. ४ ज्या देशाच्या आसपासच्या भागीं. ५ सूर्याची सावली. ६ जमिनीचे वाफे तक्ते या.

[illegible]

ज्यादेशीं मृग काळवीठ असती तो हिंदुधर्मा शुची,
दर्भ, ब्रह्मतरू, पवित्र सरिता, तीर्थें, सदन्नीं रुची ॥

स्थानें ही मुनिचीं क्वचित् बहुजनीं भूपें स्वतां पाहुनी,
गादी रायगडीं प्रशस्त रचिली सह्याद्रिला लागुनी ॥१४॥

### आर्या.

मग तो रायगडाप्रति, गागाभट्टाभिध द्विजेंद्रास ॥
काशीहुनी अणवुनी, करवी राज्याभिषेककार्यास ॥१५॥

### श्लोक.

केला मंडप, कुंडशास्त्रविधिनें, वेदी ग्रहांची बरी,
आले ब्राह्मण सर्व वेद वदनीं, ज्यांची खरी वैखरी ॥
श्रौतस्मार्तविधींत ही कुशलता, जे शुद्ध अभ्यंतरीं,
तेजानें अतिशोभती दिनपती शोभे जसा अंबरीं ॥१६॥
सामग्री सुमनें, सुगंधकमलें, जाई, जुई, मोगरी,
धूपांमोद यथेष्ट वातगतिनें संचारला अंतरीं ॥
तैसे दीप हि साज्य तें उजाळिले, गंधें नवीं केशरी,
पक्वान्नें विविधें करोनि रचिले नैवेद्य नानापरी ॥१७॥
दूर्वा, दर्भ, सुपंचपल्लव, समित्, व्रीह्यक्षता साजऱ्या,
तांबूलीदलवृंद कोमल, नव्या मोठ्या सुपाऱ्या बऱ्या ॥
आंबे, अंजिर, नारिकेळ, बकुळें, सीताफळें, जांभळें,
पेरू, रामफळें, बदाम, बदरें, अक्रोड, रंभाफळें, ॥१८॥

---

१ शुद्ध. २ पळसाचीं झाडें. ३ पवित्र नद्या. ४ वाणी. ५ सूर्य. ६ आकाशांत. ७ धूपाचा सुवास. ८ आंबा जांभुळ वगैरे पांच वृक्षांचीं पानें. ९ समिधा. १० तांदळ्याच्या अक्षता. ११ विड्याचीं पानें. १२ केळीं.

गंगापुष्करसिंधुतीर्थसलिलें, स्वर्णादिकुंभांतरीं,
सालंकार तुरंग दंतिनिवहा केले उभे स्वेरीं ॥

पवित्र जळानें पूर्ण सुवर्णादि कलश अलंकृत हत्ती घोडे.

---

कन्या मंगलवस्त्रवेष्टित अशा, सौभाग्यशाली स्त्रिया,
आल्या त्या अभिषेककार्यसमयीं प्रेमें शिवाजीचिया ॥१९॥

कन्या व सुवासिनी.

करोनी असा सर्व संभार सिद्ध,
सुलग्नीं उपाध्याय तेव्हां प्रबुद्ध ॥
सपत्नीक सिंहासनस्था नृपाला,
करीती सुपट्टाभिषेकक्रियेला* ॥२०॥

उत्तम मुहूर्तीं राज्याभिषेक होतो.

डंके, ढोल, मृदंग, गोमुख, तसे, तासे, बहू चौघडे,
वाजंत्री, रणसिंग, नौबदि, बरा बाजा ययांचा झडे ॥
तोफांचे भडके धडाधड असे होती, तदा जो ध्वनी,
झाला; ऐकुनि तो रिपूंस निपजे तत्काळ भीती मनीं॥२१॥

त्यासमयीं वाद्यांचा गजर होतो.
तोफा सुटतात.

वेश्या नाचति हौशिनें थयथयां दावूनि नाना गती,
सारंग्या, तबले, सतार, मुरजे, पावे, बरे वाजती ॥
गाती गायक, चोबदार करिती ललकार त्या उत्सवीं,
छत्रातें धरिती वेरी उडविती तें चामरें तीं नवीं ॥२९॥

कळवांतिणी नाचतात चोबदार ललकारतात छत्र धरितात चौऱ्या वारितात.

राजे लोक उपायनें बहुविधें अत्यादरें अर्पिती,
तैसे आप्त अहेर थोर करिती कोणी[12] पुढें ठेविती ॥

राजे नजराणे करितात आप्त अहेर करीत.

---

१ सोन्याच्या वगैरे कलशांत. २ अंगण्यांत. ३—४ स्त्री सहवर्तमान सिंहासनावर बसलेला जो नृप (शिवाजी) त्याला. ५ राज्याभिषेक.

आर्या.

* पंध्राशें शाहाण्णव, शककालीं ज्येष्ठ शुक्लपक्षांत ॥
झाला रायगडीं शिवनृपती अभिषिक्त ठेवि लक्षांत ॥ १ ॥

६ हीं वाद्यांचीं नांवें ७ भोंवारे. ८ सांजिऱ्या. ९ डोक्यावर (याचा अन्वय पुढे व मागें.) १० चौऱ्या. ११ सोयरे धायरे लोक. १२ कोणी अहेर पुढें ठेविती असा अन्वय.

मोठे पाटिल भेट देति रुपये आनंद पावोनियां,
अन्यानीं मुजरे दुरूनि विनया दाऊनि केले तैया
जनांस नृपती गमे, सकल योषितांना स्मर,
खलां प्रबल शासिता, निजजनांसे लक्ष्मीवरं ॥
गमे, रिपुगणांसही प्रलयकालरूपी मनीं,
शिवाजि वसुधापती, स्थित सभेत सिंहासनीं ॥२
बेड्या तोडुनि बंदिवान अवघे बंदीतुनीं सोडिले,
तैसे पोपट, सारिका, व चिमण्या जे पंजरीं[13] व
लोकांनीं इतऊर्ध्व गोधनधनासुद्धां सुखानें घरीं,
राहावें असि जाहिरात दिधली देशीं व देशांतरीं

---

दीनानाथ गरीब पंगु बधिरा अन्नें दिलीं सादरें,
केलीं ब्राह्मणभोजनें, स्वसुहृदां संतोषवीलें बरें
हेमालंकरणा महार्हवसना देऊनियां दक्षिणा,
केल्या भूपतिनें उदारमतिनें सच्छिष्टसंभावना ॥
नीतीनें मग चालवीत असतां राज्या शिवाजी प्र
कोठीं वर्षति मेघ सर्वविषयीं, धान्यादिका दे

१ मस्तकला. २ शिवाजीला. ३ साधारण लोकांस
(असा गमे.) ५ स्त्रियांस. ६ काम. ७ दुष्टांस. ८
९ स्वजनांस. १० विष्णु. ११ शिवाजीराजा. १२
याचा अध्याहार. १३ पिंजऱ्यांत. १४ सोन्याचे
१५ किंमती वस्त्रें. १६ साधुशिष्टांचा सत्कार. १७
१८ सर्वदेशीं. १९ पृथ्वी.

चोरांचें आणि अग्निचें भय नसे मारी न मारी जना,
सर्वां सौख्य असे अखंडित कधीं आधी नबाधी मना॥२७॥
जेकां मानधनाग्रणी आणिक जे शौर्यें, बळें, आगळे,
जानां सायुध देखुनी रणमुखीं भीती रिपूंचीं दळें ॥
जे का स्वामिहितार्थ दुर्लभ अशा प्राणांसही वेंचिती,
ऐसे शूरशिरोमणी स्वनिकटीं ठेवीतसे भूपती ॥२८॥

तो आपल्या संग्रहीं उत्तम मनुष्यास ठेवितो.

राजाचा पहिला प्रधान असतो संज्ञा तया पेशवा,
त्याचें काम असे दिवाणगिरिचें पंतप्रधानाख्य वा॥
ज्याचें पंतअमात्य नांव दुसरा मंत्री जमाबंदिचें,
खर्चाच्या स्थितिचेंहि काम असतें त्याच्याकडे रीतिचें २९
हुद्दा दप्तरिचा व बारनिशिचा ज्याचा, तया भूपती,
ज्ञाते पंतसचीव सभ्य अभिधा देती व सत्कारिती ॥
कोठीचा हुजरातिचाहि पति जो मंत्री तया बोलती,
सेनेचा अधिकारि जो दृढवपू त्यालाच सेनापती ॥३०॥
कामें जीं परराजकीय असती; त्यांतें स्वतां पाहणें,
राजांच्या वकिलांबरोबर सदा सद्युक्तिनें बोलणें ॥
त्या कामावर कारभारि असतो तो मानसाचा सुधा,
सारासारविचारशील सुगुणी त्याची सुमंताभिधा ॥३१॥
व्यापारांत निमग्न लोक असतां देती व घेती महां,
मध्यें उद्भवती कली ह्मणुनियां जाती नृपाच्या गृहा ॥

त्याचे अष्ट प्रधान व त्यांचीं कामें.
पेशवा.
पंत अमात्य.
पंत सचीव.
मंत्री.
सेनापति.
सुमंत.
न्यायाधीश.

---

१ जरीमरी. २ काळजी. ३ मोठेमानी. ४ हत्यारबंद. ५ लढाईत. ६ पंत प्रधान ही संज्ञा त्यालाच असते. ( या पदाचा अन्वय कामाकडे नव्हे. ७ ज्याकडे दप्तरचा हुद्दा व जो बारनिशी करणार त्याला. ८ शरीरानें बळकट. ९ सेनापति असें (बोलती. ) १० हें कलीचें विशेषण. ११ कज्ये. १२ अदालतींत.

मारामार गुन्हे दगा करिति जे, त्यांचा निवाडा क
न्यायाधीश असी तयास दिधली आख्या नृपाळें ब
शास्त्रें पाहुनि पृच्छकास कथितो प्रश्नोत्तरां जो नर,
त्यातें पंडितराव नांव वहिलें देती धराधीश्वर ॥
ऐसे अष्ट महा प्रधान अपल्या कार्यार्थ संस्थापुनी,
केलें राज्य शिवाजिनें निजबळें शत्रू लया लावुनी॥
बाळाजी अबजी, बिसाजि मथुरे, अण्णाजि दत्तो,
कृष्णाजी सखजी, शिवाजि नृहरी, कोन्हेरपंत, क्रमें
काशीपंत, निराजि रावजि, तिमाजी शामजी नायिक
पुढे त्रिंबक भास्कराख्य, सुमती विश्वासरावादिक ॥
मोरोत्रिंबक पिंगळे, नरहरि आनंदरायाव्हय,
बाळाजी रघुनाथ, रावजि सुभे, व्यंकाजि दत्तात्रय
संकाजी निळकंठ, शामजि अबा, ऐसाजि गोविंदजी
ऐसे कारकुनांत मुख्य असती मुत्सद्दि च्या ही व्रजीं॥३
विश्वासू नर ठेवितो स्वनिकटीं रक्षार्थ राज्याचिया,
राहेना मग अल्पही रिपुकृता शंका तया राजया ॥
कार्यार्थी निज सेवकांस विपुला जी देतसे संपदा,
सांगे तीच जनां कृतज्ञपण हो लोकांत त्याचें सदा॥
तो मित्रापरि सेवकां गणितसे, सप्रेमवृत्ती सदा,
मित्रातें निजबंधुसीं सम गणी देवोनियां संपदा ॥
तैसे बंधुजनास आत्मसम तो मानीतसे तत्वतां,
ऐसा सेवकमित्रबंधुसह तो वागे शिवाजी स्वतां ॥ ३७
कामक्रोधादि सारा रिपुगण जिणुनी इंद्रियांचा जयानें
वागे इच्छीतसे तो मनुविहितपथें दुर्गमें ही, श्रमानें ॥

१ मनूनें सांगितलेल्या रीतीनें. २ कठिण ( हें पथाचें विशे

काळाच्या वांटणीला करुनि निशिदिनीं आळसाला त्यजूनी,
कार्यातें नेमिलेल्या समयि करितसे नीतिमार्गा धरोनी॥३८॥

काळाची वांटणी करितो.

करी कोणि अन्याय लोकांत कांहीं,
करी दंड त्या उक्त[1] मन्वादिकांहीं[2] ॥
असो तो रिपू आप्त वा स्वीय पुत्र,
धरी त्यावरी न्यायरीत्याच शस्त्र ॥ ३९ ॥

शत्रुमित्रास समान दंड करितो.

धरी मानसीं योग्य धर्मार्थकामा,
करी उद्यमा तो बसेना रिकामा ॥
असे स्वप्रजारक्षणीं लक्ष त्याचें,
असे आत्मपुत्रावरी त्या पित्याचें ॥ ४० ॥

तो धार्मिक व उद्योगी व प्रजापालनतत्पर हो तो.

सपैल[3] पृथिवीपती शिवजिला चहू तें भिती,
अमोलिक उपायनें[4] अणुनियां तया अर्पिती ॥
मतंगरथवाजिंची[5] निबिड भीड दारापुढें,
न वायुस हि तेंधवां रिघ[6] शिरावया सांपडे ॥ ४१ ॥

धाकानें शत्रु त्याचें कसें आर्जव करीत असत तें उद्दाता लंकारानें.

सौम्या[7] कार्यं अणावया करितसे दानास तो भूपती,
दानातेंहि कदापि तो नच करी केल्याविना सत्कृती[8] ॥
ज्याचा ठाई जसा असे गुण तसी त्याची बिच्चारें पहा,
लोकीं सत्कृति तो करी नरपती स्वल्पाच[9] किंवा महा[10] ४२

तो साम, दानावांचून, दान, सत्कारावांचून-व सत्कार गुणावांचून करीत नाहीं.

गोशाळेंत जुन्या नव्या प्रसवल्या गाई ह्मसी वासरें,
खाती चार नवीन पेंड सरक्या बांधे जयांचे बरे ॥
प्रातःकाळि दुधें निघालि ह्मणजे जाती वनाभ्यंतरीं,
चारा खाउनी हिंडती मग तया गोंवारि नेती घरीं॥४३॥

गोशाळेंचें वर्णन.

---

१ सांगीतलेला ( दंड. ) २ मनुयाज्ञवल्क्य इत्यादिक धर्मप्रवर्तक आचार्यांनीं. ३ शत्रु राजे. ४ नजराणे. ५ हत्ती रथ घोडे यांची ( भीड-दाटी. ) ६ अवकाश. ७ मैत्री. ८ सत्कार. ९-१० अल्प किंवा मोठी (सत्कृती) जसा गुण असेल तदनुसार.

(शिवाजीनें जिंकिलेल्या प्रांतांपैकीं मुख्य प्रांतांचीं नांवें.)

बांधारी नळदुर्ग कोंकण पुणें कर्णाट रामेश्वर,
चंदी त्र्यंबक बागलाण बरवे प्रख्यात चंदावर ॥
एडूर स्फुट बेदनूर अरणी चांदें वराडादिका,
प्रांतांतें जिणुनी करीत वश तें राजा शिवाजी निका ४४

(त्याच्या ताब्यांतील किल्ले व गड यांचीं नांवें.)

घोंसाळागड, आरनाळ, भिंवडा, भूपाळ, तो खेळणा,
खांदेरी, बिरवाडि, सागर तुगा, तो रोहिडा, तोरणा ॥
वासोटा, शिवनेरि, मेद, सगडा, सिंव्हाख्य, तो लिंगणा,
वैराटाख्य वसंत वंदन नदी कर्नाट ही रांगणा ॥ ४६॥
कृष्णा त्र्यंबक रामसेज अंवंठा केराक कावंडसे,
कस्तूरी अमरापुरी दिधपली वल्या अनंदी वसे ॥
आकोलें मृगरम्य सिंध जवला अर्काट कड्डालका,
इत्यादी गड घेउनी विभु महा राजा करी कौतुका[1]॥ ४५॥

(अठरा कारखाने वगैरे.)

हस्ती[2], उष्ट्र, सरत्न, शस्त्र, रथ, सत्तांबूल[3], वस्तू, जलें,
धान्यें, लेखन, यंत्रें, पाक, शिबिरें, आंखेट, जेठी[11], भले॥
[12]बाबें नाटक वैद्य[13] मुख्य अठरा शाळा शिवाजीचिया,
होत्या उत्तम फारशींत ह्मणती तें कारखाने जयां ॥ ४६॥

(बारा महाल कोठी वगैरे.)

धान्यागार महाल गोधन गृहें पागा शिबंदी घरें,
वस्त्रागार हि टंकसाळ बरवी क्षेत्रादि जागा बरें ॥

---

१ हें कौतुकाचें विशेषण. २ गजशाला उष्ट्रशाला रत्नशाला अशीं अठराशालांचीं संस्कृत नांवें आहेत त्यांनांच पिलखाना उष्ट्रखाना जवाहीरखाना शिलेखाना अशीं यवनी नांवें आहेत. ३ तांबूलशाळा, सराफखाना. ४ जिन्नसखाना. ५ अंबरखाना. ६ दफ्तरखाना. ७ तोफखाना. ८ सुदबख. ९ फरासखाना. १० शिकारखाना. ११ मल्लशाला, तालीमखाना. १२ नगारखाना. १३ दवाखाना, सरबतखाना. १४ महाल कोठी. १५ जामदार. १६ महाल शेरी (बाग वगैरे.)

सौदागीर, इमारती, सुतरुणी[1] माहाल तो चौबिके[2],
द्रव्यागार असे महाल असती बारा पुरे रांजिक[3] ॥ ४७ ॥

**आर्या.**

ऐशापरी व्यवस्था, केली त्यानें प्रजेचिया अवनीं ॥
वसती एकत्र श्री, मति, नीती, ज्याचिया सदा भवनीं ॥४८॥

अशी व्यवस्था करून तो शिवाजी.

व्यंकोजी नावाचा, होता सापत्न बंधु जो राया ॥
कर्णाटकांत त्याला, मग तो जायी ससैन्य भेटाया ॥४९॥

कर्णाटकांत आपल्या भावाला भेटायास जातो.

मार्गीं गहनारण्यीं द्वादशदिन तो करी तपश्चर्या ॥
अंतीं छेदूं लागे, मस्तक तैं प्रकट जाहली आर्या ॥५०॥

मार्गी बारा दिवस घोर तप करितो.

इष्टवरा देउनि त्या, अंतर्हित जाहली भवानी ती ॥
जीच्या उपकारातें, सुरवर, किन्नर, सदैव वानीती ॥५१॥

भवानी प्रत्यक्ष येऊन त्याला वर देऊन अदृश्य होते.

---

मग तो भेटुनि भावा, परतुनि आला स्वकीय गेहातें ॥
रक्षी प्रजेस जैसें, नचि तैसें आपुल्याहि देहातें ॥५२॥

मग तो भावाला भेटून परत स्वस्थलाप्रत येतो.

कोणेएके काळीं, येई श्रीरामदास नृपसदनीं ॥
चाले संतत ज्याचा, पूर्त[4] श्रीरामनामजप वदनीं ॥५३॥
तो[5] नर नव्हेचि परिहो, धर्म स्वयमेव मूर्त्तकीं आला ॥
साधूपदेशयोगें, निज मार्गा दावण्यास नरपाळा ॥५४॥
त्या पाहतांचि सत्वर, ये भूपा कळविण्या प्रतीहारी[6] ॥
कर जोडूनि ह्मणेजी, कोणि महा साधु पातले दारीं ॥५५॥
हां हां कोठें दावी, ऐसें तो संभ्रमें पुसे नृपती ॥
साधूंच्या आगमनीं, सुविनय[7]संपन्न ते असे जपती ॥५६॥

श्रीरामदासस्वामी शिवाजीकडे येतात व त्याला बोध करितात तो प्रकार.

---

१ तरूणीमहाल (अंतःपुर.) २ लांकडें वगैरे. ३ असे राजाचे बारा महाल होते. ४ पवित्र अशा श्रीरामनामाचा जप. ५ रामदास (नर नव्हे.) ६ द्वारपालिका. ७ नम्र.

अत्यादरपूर्वक नृप, जाउनि त्याच्या पदीं करी न
सत्कुलभवा नरांचें, विमुख कधीं साधुवंदनीं नमन॥
स्वीये शिरीं मुकुटमणि, श्रेणी तेचि प्रदीपशुभराजी
तद्योगें नमनमिषें, नृप गुरुचें पादपद्म नीराजी ॥५८
विजयी भव वत्स अशा, आशीर्वादास देतसे दास
सदनुग्रहें कदापी, मानव होतो न पात्र खेदास ॥
स्वामी इकडुनि ऐसें, बोलोनी नृप तयास सदनांत
नेवोनि आसनावरि, वैसवि तो हृष्ट जो निजमनांत॥
पाद्यार्घ्यादिकपूजा, करित असे भक्तिनें नृपति त्याच
ऐसी दृढ भक्तिजनीं, पुत्राला ही नसे निज पित्याची॥
कर जोडोनि ह्मणे नृप, केलें जैसें पवित्र गेहातें ॥
पादरजें तेंवि करा, उपदेशें करुन यांहि देहातें ॥
संसारसागरीं मी, स्वामी बुडतों ययाचिया तरणीं
भवदुपदेशावांचुनि, नचि दुसरी हो मला दिसे तरणी॥
दास ह्मणे वत्सा तुज, झाली मति हे सुपुण्यराशीनें
सकलां अशुभां निरसुनि, जी अंतीं सत्पदा नराशी ने[13]
स्रक्चंदनवनितादिक विषयां वांताशनापरी त्यागी ॥
वैराग्यबोध करिते, वेदांतांची अशाच रीत्या गी[18]॥६

१ या षष्ठीचा अन्वय मन या पदाशीं. २ स्वकीय मस्तक
रील मुकुटसंबंधी मण्याची जी पंक्ति तीच. ३ दीपांची उत्तम पं
४ ओवाळी (गुरुपादपद्मातें.) ५ जो निजमनीं हृष्ट तो (
असा अन्वय. ६ या तृतीयेचा अन्वय पूर्वार्धाकडे. ७ या मा
देहाला ही (पवित्र करा.) ८ यांच्या तारणाविषयीं. ९ नौ
१० पातकांस. ११ उत्तम पदाप्रत. १२ नराला. १३ ने
१४ फुलांच्या माळा, चंदनाची उटी, स्त्रिया इत्यादि विषय
१५ ओकून टाकलेल्या पदार्थाचें पुनः भक्षण करणें त्याप्रमा
१६ वैराग्याचा बोध. १७ वेदांतशास्त्राची. याचा संबंध गिर
१८ वाणी (वाक्यें.)

यास्तव गृहदारादिक, विषयक सोडुनि समस्त आसक्ती ॥
श्रीसद्भगवत्पदयुग-कमलाची सर्वदा करी भक्ती ॥६६॥
कामक्रोधादिक षट्, वैरी हे त्रास देति जीवास ॥ कामादि षड्रिपू
त्यांत हि मानवदेहीं, करिते हृदयांत काळजी वास ।६७।
सुज्ञें धरूं नये बा, दुष्ट जनाच्या कदापि संगतिला ॥
तत्सम दुसरा न दिसे, प्रतिबंधनहेतु वेंत्स सद्गतिला ।६८।
उपडुनियां टाकावें, प्रथमचि रे या मनांतुनी कामा ॥ काम.
सर्वानर्थकरचि तो,ह्मणुनि तयाची स्थिती नये कामा[2]॥६९॥
कामावाप्ति[3] न होतां, क्रोधाची येतसे मना उकळी ॥
जेथें क्रोधोत्पत्ती, तेथें आहेचि बा अगाउ[4] कळी[5] ॥७०॥
कामानें सर्वांचें, बाटविलेंसे नरोत्तमा चित्त ॥
तेणें पूर्त[6] विरक्ती[7], न रुचे रुचते सदार सुतवित्त॥७२॥
असती[8] युवती[9] करिती, परोपरी नरवरा ; सदा नखरे ॥
न खरे मानावे ते, देती जें सुमतिच्या[10] नळीं[11] नख रे॥७३॥
कांताकनकधनादिक, जैसा देतें मनास अति माज ॥
तैसा भांग अफू मधु, यांचा ही देतनाहिच समाजे[12] ॥७४॥
षड्रिपुमाजीं भूपा, जाणे बा अग्रगण्य काम खरा ॥
तत्पर होतो नर जो, अणुमात्रहि तो उणा असे न खरा[13] ७३
भग्न मनोरथ होतां, क्रोधानें व्याप्त होतसे नर तो ॥ क्रोध.
यास्तव मुळींच कामीं, चित्त तुझें नरपते कधीं न रतो ७४

---

१ हें संबोधन. २ उपयोगास. ३ इच्छित नमिळालें तर. ४ पूर्वीच. ५ कलह. ६ पवित्र. ७ वैराग्य. ८ दुष्ट. ९ स्त्रिया. १० सद्बुद्धीच्या. ११ नळीं नखदेणें ह्मणजे ठार मारणें. १२ समुदाय. ( भांग अफू इत्यादिकांचा ) १३ गाढवाळा ( अणुमात्र हि उणा न. )

तो नर नव्हेचि अंध, क्षितीश्वरा जो विहीन नयन
क्रोधाधीनचि अंध, श्रेष्ठ वदति त्यांत अन्यथा नाहीं॥
पापाला मूळ असे, लोभ असें सर्व बोलती संत ॥
जो त्यागी लोभातें, त्याच्या सौख्या नसेचि बा अंत॥
अज्ञानें मोह पडे यास्तव तूं ज्ञान आधिं संपादी
नसताही सर्प दिसे, अज्ञानाच्या वशेंचि, जी वादी
मोहाच्या योगानें, ज्ञान्याहि भ्रांति पडतसे मोठी ॥
त्यावरि ईशदया बहु, तोचि दूर ह्या मनांतुनी लोटी
धनयौवनादियोगें, येतो जो माज तोचि मद जाण
रावणबाणार्जुनमुख नाशियले वश करोनियां जाणें॥
परदुःखसुखानीं जो, क्रमें करित सौख्य, दुःख, मत्सर
त्यातें सोडुनि संगीं, चित्त तुझें साधुंच्याचि वत्स रतो
त्रैलोक्याही जिंकी, त्याला विजयी अहो कधीं न ह
परि ह्या षड्रिपुवर्गा, जिंकी त्यालाच मात्र विजयि गणु
आहे एक जगाचा, सृष्टिस्थितिनाशनास कर्ता रे ॥
ज्यानें इच्छामात्रें, निर्मियले, भूखगोल खग तारे॥ ८
श्रीरामादिक रूपा, घेउनियां जो जगांत अवतरतो
त्यातें प्रेमपुरःसर, भजतो निश्चयें मनुष्य भव तरतो॥८
ऐसा तो दासकृता, बोधा ऐकुनि विरागयुत चित्तें ॥
मानी तत्काल मनीं, तृणवत् सारीं सदारसुतवित्तें ॥८

१ जी वादी ती ( अज्ञानमूलक मोहानें सर्प भासतो. ) २ मोहाला. ३ रावण, बाणासुर, कार्तवीर्यार्जुन इत्यादिकांस [illegible] मद आहेत. ) ४ ज्या पदानें. ५ पराच्या दुःखानें व पराच्या सुखानें दुःख व्हावें असा मत्सरात गुण आहे. ६ [illegible] मनीं. ७ सज्जनांच्या. ह्या षष्ठीचा संबंध संगीं याकडे. ८ भू [illegible] मह नक्षत्रें. ९ निश्चयेंकरून ( हें अव्यय होय. )

गुरुचें मुख तेंचि कमल तत्कृतबोधामरंदचि ह्मणावें ॥
कर्णपुटें पानकरी, शिव त्या ह्मणुनी नकां अलि गणावें८५

वैराग्यभाग्य येतां, भूप ह्मणे मज नकोचि वैभव हें ॥
संपत्ती राज्य धनें, दिसती मजला समस्त दुःखैवहें ॥८६॥

ठेवुनि पुनःपुन्हा तो, दासाच्या पादपंकजीं भाळा ॥ — तो रामदासाला सर्व राज्य समर्पितो.
आतां राज्य नको मज, ह्मणे इतःपर तुह्मीच सांभाळा८७

---

पाहुनि त्याचा आग्रह, दास ह्मणे माझियाच नामानें ॥ — रामदास तें त्यालाच चालवायास सांगतो.
चालवणें राज्य तुवां, हें मग त्या नृपतिच्या मना मानें॥८८॥

---

भगवा पटका कटकीं, अभिवंदन रामराम शब्दानें ॥ — आपलीं दोन चिन्हें खुणाचें सांगतो.
ही स्वस्वामित्वाचीं, कथिलीं चिन्हें तयास दासानें ॥८९॥

---

शिर सामान्य करोनी, नृपकरि पूजन पुनश्च दासाचें ॥ — मग आशीर्वाद देऊन.
घेई आशीर्वाद हि, त्याचे ते होत जे सदा सांचे ॥९०॥

ठेवुनि हस्तक मस्तकिं, जाती मग रामदास निजभवनीं॥ — रामदास स्वस्थळास जातो.
यत्कीर्तिंदुकरांहीं, धवलित अद्यापि ही असे अवनी ॥९१॥

---

१ फुलांतील रस. २ भ्रमर. ३ दुःखकारक. ४ लश्करांत भगवें निशाण बाळगणें आणि अभिवंदनसमयीं रामराम असें ह्मणणें हीं दोन माझीं चिन्हें चालवून तूंच हें राज्य माझ्या वतीनें चालीव असी रामदासानें शिवाजीस आज्ञा केली. त्याप्रमाणें शिवाजी दासाच्या संतोषार्थ मान्य करिता झाला. यासाठीं लश्करांत भगवा झेंडा वापरण्याचा आणि मराठ्यालोकांत परस्परें अभिवंदन करिते वेळीं "रामराम" असे शब्द उच्चारण्याचा जो संप्रदाय पडला आहे तो तेव्हांपासूनच होय. ५ रामदासाचे (आशीर्वाद.) ६ जे आशीर्वाद. ७ खरे (होत.) ८ ज्या रामदासाच्या कीर्तिरूपचंद्रकिरणांनीं. ९ शुभ्र झालेली. १० पृथ्वी.

## श्लोक.

शिवाजीच्या कारकीर्दीचा उपसंहार.

क्षितीं श्री[1]शपदास सत्यवचना जो नित्य जिव्हेवरी,
शत्रूंच्या[2] मुकुटास पादयुगुलीं दानें[3]श्रियेतें करीं[4] ॥
वाक्यें श्रीगुरु[5]च्या मही[6]सहि भुजीं[7], शीर्षीं[8] किरीटा[9] धरी[10],
धर्मानें जनपालनास सुमती तो श्रीशिवाजी करी ॥९२॥
पूर्वी ज्या रचना[11][12] बनूनि अवघ्या गेल्या लया त्या अतां,
दावी वाग्विभवें[13] जगांत कवि जो प्रत्यक्ष ची तत्वता ॥
त्याची त्यासमयीं क्वचित् चुकि पडे, आणूनका ती मनीं,
कारुण्यांबुधि[14]ला तुम्हा विनवितो पाणिद्वया[15] जोडुनी ॥९३॥
ज्याचा तात असे सदाशिव कृती माता सती पार्वती,
गांव त्र्यंबक हें गणेश अभिधा लेले उपाख्याहि ती ॥
त्याणें हें शिवराजकाव्य रचिलें, त्यांतील हा सातवा,
सर्ग श्रेष्ठ विलोकुनी निजमनीं भावामृता सांचवा ॥९४

१ ईश्वरपदास (चित्तिं.) २ ह्मणजे शत्रु पायावर डोई ठेवीत. ३ दानाची जी शोभा तिला. ४ हतांत. ५ रामदासाच्या (वचनावरून.) ६ पृथ्वीला. ७ भुजाच्या ठायीं, ह्मणजे पृथ्वीचें राज्य करी. ८ मस्तकावर. ९ मुकुटास. १० धारण करिता झाला (ह्या क्रियेचा अन्वय वरील सहाही वाक्यांत आहे.) ११ काव्याच्या पहिल्या पद्यांत आरंभींच जसें शिवाजी हें पद घातलें तसेंच हें पुढें शेवटल्या पद्याच्या शेवटींही घातलें आहे आणि तेथल्या रचनेंत पुढेंही तें वाक्यांत अन्वित असून मंगलरूप अर्थाचा ध्वनी करितें. तेवीच या श्लोकाचे चारही चरणांत श्रीपद मंगलाकरितां घातलें आहे. १२ संसारस्थिति. १३ वाक्चातुर्य. १४ करुणासागर. १५ करद्वय.

इतिश्रीमच्छिवराजचरिताख्ये महाकाव्ये श्रीशिवाजीमहारा-
जस्य राज्याभिषेकवर्णनं नाम सप्तमः सर्गः ॥

